# गाढवावरचे ग्रंथालय

जेनिट विंटर

मराठी अनुवाद – मानसी महाजन





कोलंबियाच्या घनदाट जंगलात एक माणूस राहत असे. त्याचे पुस्तकांवर खूप प्रेम होते.

त्याचे नाव होते लुइस.



एक पुस्तक वाचून होते न होते तोच लुईस दुसरे पुस्तक घरी आणायचा. लवकरच त्याचे सगळे घर पुस्तकांनी भरून गेले.
त्याची बायको, डायना, त्याच्यावर चिडत असे.


एवढ्या सगळ्या पुस्तकांचे काय लोणचे घालायचे का?

लुइसने खूप विचार केला, आणि
शेवटी त्याला एक युक्ती सुचली.



डोंगराच्या पलीकडे लोकांची वस्ती आहे, तिथे
लोकांकडे पुस्तके नाहीत. त्यांना मी ही
पुस्तके वाचायला देऊ शकतो!



एक गाढवावर मी पुस्तके ठेवेन,
दुसऱ्या  गाढवावर स्वतः  बसेन.

लुइसने लगेच दोन धष्टपुष्ट गाढवे
विकत घेतली. त्यांची नावे
ठेवली ‘अल्फा’ आणि ‘बीटो’.






गाढवांच्या पाठीवर पुस्तके
ठेवण्यासाठी त्याने एक छोटे
कपाट तयार केले. त्यावर नाव
लिहिले ‘गाढवावरचे ग्रंथालय’!
डायनाने त्यात पुस्तके भरली.

दर आठवड्याला लुइस, अल्फा आणि बीटो डोंगरदऱ्या तुडवत लांबलांबच्या गावांना भेट देत.






सूर्य डोक्यावर चढला की
लुइस आणि त्याची गाढवे
एखाद्‌या झऱ्याजवळ आराम
करत. गार पाणी पीत. मात्र
पाणी प्यायल्यावर बीटो ला
पुढे चालायचा आळस येई.

लुइस त्याचा लगाम ओढे, पण  बीटो मात्र तसूभरही हलत नसे.




बराच वेळ आढेवेढे घेऊन शेवटी एकदाचा बीटो पुढे जायला तयार होई.

डोंगरावर जातानाचा रास्ता अगदी सुनसान होता.
तिथे फक्त पक्षांचा काय तो आवाज येत असे.
एकदा अंधारातून एक डाकू त्यांच्या समोर उभा
ठाकला.



“कृपया आम्हाला जाऊ द्या!’ लुइस ने हात जोडले. “मुले आमची वाट बघत असतील.”

गाढवावर पुस्तकांव्यतिरिक्त काही नाही हे पाहून डाकू चिडला.

एक पुस्तक हिसकावून घेऊन म्हणाला, “पुढल्या वेळी मात्र मला चांदी पाहिजे!”



गाढवावरचे ग्रंथालय पुढे निघाले.

डोंगर ओलांडून गेल्यावर लुइसला खाली घरे दिसली. एल-टोरमेंटो मधली मुले धावत त्याला भेटायला येत होती.





पुस्तके वाटण्याआधी लुइस मुलांना गोष्ट सांगे.

आज तुमच्यासाठी एक विशेष भेट आणली आहे!" लुइस म्हणाला.

पुस्तकांच्या ढिगामागून लुइसने मुखवट्यांचा एक गठ्ठा काढला. प्राण्यांचे मुखवटे!

तुम्ही सगळे मुखवटे घाला, मग मी तुम्हाला प्राण्यांची एक गोष्ट सांगेन."




गोष्ट ऐकून झाल्यावर
सर्व मुले एक एक पुस्तक
निवडत.

लुइसला टाटा करून, पुस्तके उराशी कवटाळून मुले आपापल्या घरी जात.



लुइस, अल्फा, आणि बीटो डोंगर ओलांडून घरी परतत.



घरी पोचण्यासाठी त्यांना अनेक जंगले आणि नद्या
पार कराव्या लागत.



घरी पोचल्यावर लुइस आपल्या भुकेल्या गाढवांना चारा देत असे आणि डायना आपल्या भुकेल्या नवऱ्याला जेवायला वाढत असे. लवकर झोपायचे सोडून लुइस जेवण झाल्यावर हातात पुस्तक घेऊन उशिरापर्यंत वाचत बसे.

आणि दूर तिकडे डोंगरापालिकडे उशिरापर्यंत
मेणबत्त्यांचा प्रकाश दिसे.




तिथली मुलेही उशिरा पर्यंत गाढवावरच्या ग्रंथालयातून
घेतलेली पुस्तके वाचत असत.

ही गोष्ट लुइस सोरयिआना यांच्या आयुष्यावर आधारित आहे. लुइस कोलंबियामधल्या 'ला-ग्लोरिया' नावाचे छोट्या गावात राहतो. स्वतः शिक्षक म्हणून काम केल्यामुळे पुस्तकांचे महत्त्व आणि त्यांची बदल घडवून आणण्याची ताकत लुइसला ठाऊक होती. त्या प्रदेशातील मुलांना वाचायला पुस्तके मिळणे दुरापास्त होते. अनेक घरात तर एकही पुस्तक नव्हते.



२००० साली लुइसने दोन गाढवांवर पुस्तके लादून ग्रंथालय सुरू केले. त्याने फक्त ७० पुस्तके घेऊन सुरुवात केली, मात्र आता त्याच्याकडे तब्बल ४८०० पुस्तके आहेत. बहुतांश पुस्तके लोकांनी देणगी म्हणून दिलेली आहेत. दर शनिवार-रविवार लुइस दूरच्या गावांमध्ये जातो. तिथे ३०० लोक पुस्तके घेण्यासाठी त्याची आतुरतेने वाट बघत असतात. जगातला एक कोपरा पुस्तकांनी समृद्ध होतो आहे!



